बारामती जि.पुणे येथे रेशीम कोष खरेदी-विक्री बाजारपेठ व कोषोत्तर प्रक्रिया पथदर्शक तथा प्रशिक्षण केंद्र इत्यादी सोयी सुविधा उभारणी प्रकल्पाकरिता निधी उपलब्ध करून देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- सपववि-४००१५/१/२०२४-DESKSERICULTURE-CMTD**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- २१ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक प्राவियो-१०१८/प्र.क्र.४५/ रेशीम कक्ष, दिनांक ०३.०५.२०१८.

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक केपुयो-२०२१/प्र.क्र.३०/ रेशीम कक्ष, दिनांक २१.०४.२०२२.

३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक केपुयो-२०२१/प्र.क्र.३०/ रेशीम कक्ष, दिनांक ०५.१२.२०२२.

४) वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं-१०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

५) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्रमांक रेशीम/कार्या-८/को.बा./बारामती/निधी मागणी/सन २०२३-२४/१६७२, दि.२०.१२.२०२३

६) वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं-१०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि.०४.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील शेतकऱ्यांनी उत्पादित केलेल्या तुती रेशीम कोषांना बाजारपेठ उपलब्ध व्हावी, तसेच कोषोत्तर प्रक्रियेला चालना मिळावी म्हणून बारामती, जि.पुणे येथे कृषि उत्पन्न बाजार समितीच्या मुख्य आवारातील १.०० एकर जागेवर रेशीम कोष खरेदी-विक्री बाजारपेठ व कोषात्तर प्रक्रिया पथदर्शक तथा प्रशिक्षण केंद्र इत्यादी सोयी सुविधा उभारण्यासाठी येणाऱ्या ₹९५६.६२ लक्ष इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार बारामती, जि.पुणे येथे रेशीम कोष खरेदी-विक्री बाजारपेठ व कोषात्तर प्रक्रिया पथदर्शक तथा प्रशिक्षण केंद्र इत्यादी सोयी सुविधा उभारण्याबाबतच्या प्रकल्पाच्या निविदा प्रक्रिया राबवण्यासाठी प्रशासकीय मान्यता रक्कमेच्या १०% म्हणजेच ₹९५.६६ लक्ष इतका निधी वितरीत व खर्च करण्यास संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. संचालक (रेशीम) यांच्या संदर्भाधीन दि. २०.१२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रादेशिक रेशीम कार्यालय, पुणे यांनी तांत्रिक मान्यता निविदा प्रसिध्द करून ठेकेदार निश्चित करणे व कार्यारंभ आदेश देणे या बाबीसाठी ₹८६०.९६ लक्ष इतका निधी उपलब्ध करण्याची विनंती शासनास केली आहे. संचालक (रेशीम) यांच्या विनंतीच्या अनुषंगाने कृषि उत्पन्न बाजार समिती, बारामती, जि.पुणे येथे रेशीम कोष खरेदी-विक्री बाजारपेठ व कोषात्तर प्रक्रिया पथदर्शक तथा प्रशिक्षण केंद्र इत्यादी सोयी सुविधा उभारण्यासाठी ₹८६०.९६ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रेशीम विकास कार्यक्रमांतर्गत पायाभूत सुविधा निर्माण व अस्तित्वातील सुविधांचे बळकटीकरण योजनेंतर्गत कृषि उत्पन्न बाजार समिती, बारामती, जि.पुणे येथे रेशीम कोष खरेदी-विक्री बाजारपेठ व कोषात्तर प्रक्रिया पथदर्शक तथा प्रशिक्षण केंद्र इत्यादी सोयी सुविधा उभारण्यासाठी ₹८६०.९६ लक्ष (रुपये आठ कोटी साठ लक्ष शहाण्णव हजार फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त निधी हा ज्या कामांसाठी उपलब्ध करून दिला आहे त्याच कामांवर व प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेच्या मर्यादेत व दि.२१.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीची पूर्तता करण्याच्या अधीन राहून खर्च करण्याची तसेच सदर प्रकल्प विहित वेळेत पूर्ण होईल याची संबंधित यंत्रणानी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाने तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास विहित मुदतीत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी लेखाधिकारी, रेशीम संचालनालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V003) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर संचालक (रेशीम) यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

५. उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ००, १०७, रेशीम उद्योग, (०१) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०१)(०२) राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम रेशीम विकास कार्यक्रमांतर्गत पायाभूत सुविधा निर्माण करणे व अस्तित्वातील सुविधांचे बळकटीकरण (कार्यक्रम) (२८५१६५८३), ३३, अर्थसंकल्प" अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.२०५/२०२४/व्यय-२, दि.१२.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२११४१२०८५००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRADDHA DEVEN KOCHAREKAR

Digitally signed by SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC51883E2B27843640CD6C07C96E3E8715CC5BFBE554420E4D68E5F4B112388A, cn=SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
Date: 2024.03.21 14:22:13 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे.
१०) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.
११) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
१२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व) विभाग, पुणे .
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे .
१४) सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, पुणे.
१५) रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-१, जिल्हा रेशीम कार्यालय, पुणे .
१६) सचिव, बारामती कृषि उत्पन्न बाजार समिती, बारामती जि.पुणे.
१७) निवड नस्ती (रेशीम कक्ष).